वनक्षेत्रपाल, गट-ब संवर्गातून सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक: एमएफएस-१०.२३/प्र.क्र.१९३/ फ-८**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ ऑगस्ट, २०२४

**शासन आदेश :-**

सन २०२३-२४ वर्षाच्या निवडसूचीमधून वनक्षेत्रपाल, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांना सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) (वेतनश्रेणी S-१८ रू. ४९१००-१५५८००) या संवर्गात पदोन्नती देण्याचे शासनाच्या विचाराधिन आहे. श्री.निलय भोगे व इतर पदोन्नत वनक्षेत्रपाल यांनी वनक्षेत्रपाल संवर्गाच्या ज्येष्ठतायादी विरूद्ध मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.१२२८/२०२३ व संकीर्ण अर्ज क्र.६२९/२०२३ मध्ये मा.न्यायाधिकरणाने दिलेल्या आदेशाविरूद्ध मा.उच्च न्यायालयामध्ये दाखल रिट याचिका क्र.२६४४/२०२४ मध्ये दि.०२.०८.२०२४ रोजी अंतिम आदेश दिले आहेत.

२. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशाविरूद्ध श्री.निलय भोगे व इतर पदोन्नत वनक्षेत्रपाल यांनी मा.सर्वोच्च न्यायालयामध्ये विशेष अनुमती याचिका क्र.३५४२८/२०२४ दाखल केली आहे. वनक्षेत्रपाल संवर्गाच्या ज्येष्ठतायाद्यांविरूद्ध विविध मा.न्यायालयात तसेच मा.न्यायाधिकरणांमध्ये न्यायालयीन प्रकरणे दाखल आहेत.

३. त्यानुषंगाने मा.उच्च न्यायालय व मा.न्यायाधिकरणांमधील दाखल न्यायालयीन प्रकरणांच्या निर्णयाच्या अधिन राहून सन २०२३-२४ वर्षाच्या निवडसूचीमध्ये वनक्षेत्रपाल, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांना सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) पदोन्नतीच्या नियमित निवडसूचीमध्ये तीन पदे राखून ठेऊन पदोन्नती दिली आहे. सामान्य प्रशासन विभागाने मान्यता दिलेल्या तदर्थ निवडसूचीमधील ३२ वनक्षेत्रपालांपैकी पात्र असणाऱ्या ३१ वनक्षेत्रपालांना सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गात सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने खालील प्रमाणे पदोन्नती देण्यात येत आहे.

**<u>पदोन्नतीची निव्वळ तात्पुरती तदर्थ निवडसूची:-</u>**

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | वाटप केलेला महसूल विभाग | पदोन्नतीने पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | |
| १. | सुहास बालासो पाटील, वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, आटपाडी, सामाजिक वनीकरण विभाग सांगली | नागपूर | सहायक वनसंरक्षक (नियोजन) महाराष्ट्र पर्यायी वनीकरण निधि व्यवस्थापन व नियोजन प्राधिकरण कॅम्पा प्र.मु.व.स. कार्यालय, नागपूर. | रिक्त पदी |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | वाटप केलेला महसूल विभाग | पदोन्नतीने पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | |
| २. | वैभव संभाजी घार्गे, वनक्षेत्रपाल, कोरेगाव (प्रा.), सातारा वनविभाग | अमरावती | सहायक वनसंरक्षक (वन्यजीव), सिपना वन्यजीव विभाग, स्थित परतवाडा | रिक्त पदी |
| ३. | ज्ञानेश्वर सुभाष देसाई, वनक्षेत्रपाल, वन्यजीव, चाळीसगाव, छत्रपती संभाजीनगर वन्यजीव विभाग | अमरावती | सहायक वनसंरक्षक (कॅम्पा व वन्यजीव), अमरावती वन विभाग, | श्रीमती ज्योती पवार यांच्या प्रस्तावित पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या पदी |
| ४. | मनिषा शंकरराव चव्हाण, वनक्षेत्रपाल, साकोली (प्रा.), भंडारा वनविभाग | नागपूर | सहायक वनसंरक्षक (नविन नागझिरा अभयारण्य) उमरझरी स्थित साकोली, नवेगाव - नागझिरा व्याघ्र प्रकल्प | रिक्त पदी |
| ५. | सचिन काशिनाथ खुणे, वनक्षेत्रपाल, कांदळवन कक्ष, पश्चिम मुंबई | अमरावती | सहायक वनसंरक्षक (वनीकरण), अकोला वनविभाग, अकोला | रिक्त पदी |
| ६. | श्रीधर गोविंदराव कवळे, वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, अहमदपूर, सामाजिक वनीकरण विभाग, लातूर | नागपूर | उपसंचालक, चंद्रपुर विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधीनी (वने) चंद्रपुर | रिक्त पदी |
| ७. | हनुमंत आनंदराव जाधव, वनक्षेत्रपाल, वडगाव मावळ (प्रा.), पुणे वनविभाग | नागपूर | उप संचालक (शिक्षण-१), चंद्रपुर विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधीनी (वने) चंद्रपुर | रिक्त पदी |
| ८. | विनोद नारायण बेलवाडकर, वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, कणकवली, सामाजिक वनीकरण विभाग, सिंधुदूर्ग | अमरावती | सहायक वनसंरक्षक (मुल्यांकन-१), मुल्यांकन विभाग, यवतमाळ | रिक्त पदी |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | वाटप केलेला महसूल विभाग | पदोन्नतीने पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | |
| ९. | अश्विनी चंद्रकांत जाधव, वनक्षेत्रपाल, सुधागड पाली (प्रा.), अलीबाग वनविभाग | नागपूर | उपसंचालक- १ चंद्रपुर विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधीनी (वने) चंद्रपुर | रिक्त पदी |
| १०. | अभय प्रसाद अटकळ, वनक्षेत्रपाल, नागद (वन्यजीव), छत्रपती संभाजीनगर वन्यजीव विभाग | अमरावती | सहायक वनसंरक्षक, (सामाजिक वनीकरण) बुलढाणा | रिक्त पदी |
| ११. | शरयु सुरेशराव रुद्रवार, वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण विभाग, नांदेड | अमरावती | सहायक वनसंरक्षक (प्रादेशिक), वाशिम वनविभाग, वाशिम | रिक्त पदी |
| १२. | सुवर्णा अशोक इंगोले, वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण परिक्षेत्र उमरखेड, सामाजिक वनीकरण विभाग, यवतमाळ | अमरावती | सहायक वनसंरक्षक, (सामाजिक वनीकरण) अकोला | श्री.सुरेश वडोदे यांच्या प्रस्तावित पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या पदी |
| १३. | स्नेहल सुरेश म्हसकर, वनक्षेत्रपाल, सफाळे (प्रा.), डहाणू वनविभाग | नागपूर | सहायक वनसंरक्षक (रजा राखीव पद), नागपूर अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्य आयोजना - पूर्व), नागपूर | रिक्त पदी |
| १४. | पल्लवी दत्तात्रय चव्हाण, वनक्षेत्रपाल, कडगाव (प्रादेशिक), कोल्हापूर वनविभाग | नागपूर | सहायक वनसंरक्षक (वन्यजीव) कक्ष-२३ (६), प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), म.रा., नागपूर | रिक्त पदी |
| १५. | साईतन्मय सुधीरराव डुबे, वनक्षेत्रपाल, कोलारा (वन्यजीव), ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर | नागपूर | सहायक वनसंरक्षक (जंकास कॅम्पा व जमिन) चंद्रपूर उप संचालक, बफर ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प चंद्रपूर | रिक्त पदी |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | वाटप केलेला महसूल विभाग | पदोन्नतीने पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | |
| १६. | हेमंत वसंत उबाळे, वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण अहमदनगर | नाशिक | सहायक वनसंरक्षक (वन्यजीव), वन्यजीव वनविभाग , नाशिक, नांदूरमधमेश्वर स्थित निफाड | रिक्त पदी |
| १७. | सुहास रविन्द्र कांबळे, वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, दिग्रस, सामाजिक वनीकरण विभाग, यवतमाळ | नागपूर | सहायक वनसंरक्षक (वनसमुपयोजन व कंत्राटदाराचे उच्चाटन) कोका अभयारण्य वनसंरक्षक (वन्यजीव), भंडारा स्थित गोंदिया | रिक्त पदी |
| १८. | सुहास सिताराम पाटील, वनक्षेत्रपाल, राधानगरी (वन्यजीव), सह्याद्री व्याघ्र राखीव कोल्हापूर | नागपूर | सहायक वनसंरक्षक (जैव विविधता), अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव - पूर्व), नागपूर | रिक्त पदी |
| १९. | जनमेजय व्यंकटराव जाधव, वनक्षेत्रपाल, मानोरा (प्रादेशिक), वाशिम वनविभाग | छत्रपती संभाजीनगर | उप संचालक (शिक्षण-१), वन प्रशिक्षण संस्था, जालना | रिक्त पदी |
| २०. | मंगेश महादेव बाळापुरे, वनक्षेत्रपाल, (वन्यजीव) पाटनबोरी, पांढरकवडा वन्यजीव विभाग | नागपूर | उपविभागीय वन अधिकारी (वन्यजीव), आलापल्ली | रिक्त पदी |
| २१. | पुजा गिरीशराव जोशी, वनक्षेत्रपाल, दिंडोरी (प्रा.), पूर्व भाग नाशिक | नागपूर | सहायक वनसंरक्षक (कार्य आयोजना), कार्य आयोजना विभाग, नागपूर | रिक्त पदी |
| २२. | रोहिणी बाबासाहेब शिणगारे, वनक्षेत्रपाल, भुम (प्रा.), धाराशीव वनविभाग | छत्रपती संभाजीनगर | सहायक वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, धाराशिव | श्री.चौबे यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणाऱ्या पदी |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | वाटप केलेला महसूल विभाग | पदोन्नतीने पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | |
| २३. | रविंद्र सदाशिव सुर्यवंशी, वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, चंदगड, सामाजिक वनीकरण विभाग, कोल्हापूर | नागपूर | सहायक वनसंरक्षक, (संलग्न अधिकारी) वडसा | रिक्त पदी |
| २४. | तुषार दादाभाऊ नवले, वनक्षेत्रपाल, कराड (प्रा.), सातारा वनविभाग | नागपूर | सहा. वनसंरक्षक (मुल्यांकन) नागपूर, वनसंरक्षक (मुल्यांकन) नागपूर यांचे कार्यालय | रिक्त पदी |
| २५. | वृषाली सोपान गाडे, वनक्षेत्रपाल, नाशिक (प्रा.), पश्चिम नाशिक वनविभाग | नागपूर | उपसंचालक-२ चंद्रपुर विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधीनी (वने) चंद्रपुर | रिक्त पदी |
| २६. | दयानंद महादेव कोकरे, वनक्षेत्रपाल, माळशिरस (प्रा.), सोलापूर वनविभाग | नागपूर | सहायक वनसंरक्षक (वनीकरण, संरक्षण व अतिक्रमण निर्मुलन), वर्धा वन विभाग, वर्धा | रिक्त पदी |
| २७. | दत्तात्रय हिरामण लोंढे, वनक्षेत्रपाल, एरंडोल (प्रा.), जळगाव वनविभाग | नागपूर | सहा.वनसंरक्षक (बफर), बोर व्याघ्र प्रकल्प वर्धा | रिक्त पदी |
| २८. | विश्वनाथ सोमनाथ चव्हाण, वनक्षेत्रपाल, आलेगाव (प्रा.), अकोला वनविभाग | नागपूर | उप संचालक (शिक्षण-३), चंद्रपुर विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधीनी (वने) चंद्रपुर | रिक्त पदी |
| २९. | अनिरुध्द अनिल ढगे, वनक्षेत्रपाल, माणगाव (प्रा.), रोहा वनविभाग | नागपूर | सहायक वनसंरक्षक (निसर्ग पर्यटन व संरक्षण), चंद्रपूर | रिक्त पदी |
| ३०. | प्रदिप रमेश कदम, वनक्षेत्रपाल, अकोले (प्रा.) अहमदनगर वनविभाग | नागपूर | सहायक वनसंरक्षक (मुल्यांकन-१), चंद्रपूर विभागीय वन अधिकारी, मुल्यांकन विभाग, चंद्रपूर | रिक्त पदी |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | वाटप केलेला महसूल विभाग | पदोन्नतीने पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | |
| ३१. | कोमल विकास जाधव, वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण आर्वी, सामाजिक वनीकरण विभाग, वर्धा | नागपूर | सहायक वनसंरक्षक (वन्यजीव) मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पेंच राष्ट्रीय उद्यान, नागपूर (STPF) नागपुर | रिक्त पदी |

२. वरील अधिकाऱ्यांना निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

i) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या निर्णयाच्या अधिन राहून प्राप्त मान्यतेस अनुसरुन तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०७/०५/२०२१ च्या शासन निर्णयामधील सुचनांनूसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत आहे.

ii) वरील अधिकाऱ्यांची पदोन्नती ही वनक्षेत्रपाल संवर्गाच्या अंतिम जेष्ठतेच्या व त्यामध्ये होणाऱ्या बदलांच्या अधीन राहील व या पदोन्नतीमुळे वरील अधिकाऱ्यांना सदर पदोन्नतीच्या दिनांकापासून जेष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

iii) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाजेष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही. तसेच सदर पदोन्नत्या तदर्थ स्वरूपाच्या असून त्या केवळ पदोन्नत कोट्यात उपलब्ध होणाऱ्या पदांनुसार नियमित करण्यात येतील.

iv) महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठतेचे विनियमन), नियमावली २०२१ मधील नियम २ (ड) मधील तरतुदीनुसार, पदोन्नतीने नियुक्ती होणाऱ्या सदर अधिकाऱ्यांनी पदोन्नतीचे आदेश निर्गमित झाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांच्या विहित मुदतीमध्ये रुजू होणे आवश्यक राहील.

v) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३१०/का-१२, दि.१५/१२/२०१७ मधील तरतुदीनुसार विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीच्या दिनांकाला निलंबित आहेत किंवा त्यांचेविरुद्ध शिस्तभंग विषयक कार्यवाहीच्या अनुषंगाने दोषारोप बजावून शिस्तभंग विषयक कार्यवाही चालू झालेली आहे किंवा या अधिकाऱ्यांविरूद्ध फौजदारी आरोपाचे न्यायालयीन प्रकरण प्रलंबित आहेत अशा अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीच्या प्रकरणात विभागीय पदोन्नती समितीने त्यांची गोपनीय अभिलेखाच्या व इतर सेवाप्रवेश नियमाच्या तरतुदींच्या अनुषंगाने पात्रता तपासली असून या अधिकाऱ्यासंदर्भात विभागीय पदोन्नती समितीने केलेले मुल्यमापन आणि दिलेली प्रतवारी स्वतंत्र पाकीटात मोहरबंद करून ठेवण्यात आली आहे.

vi) सदर अधिकाऱ्यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती कोणतीही पुर्व सूचना वा नोटिस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

४. सदर पदोन्नत अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीने पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्यापासून तात्काळ पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे कार्यमुक्त केल्यानंतर विहित मुदतीत ते पदस्थापनेच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहित धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.३०/०४/१९९१ व दि.१२/०९/२०१६ मधील नमूद तरतुदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच पदोन्नती नाकारणाऱ्या अधिकाऱ्यांना आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत वनक्षेत्रपाल पदाचा १०/२० वर्षाचा लाभ दिला असल्यास तो तात्काळ थांबविण्यात यावा व त्यांना सहायक वनसंरक्षक संवर्गात प्रत्यक्ष पदोन्नतीनंतर सदरचा लाभ देण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

५. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याने सहायक वनसंरक्षक या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यावर वेतन निश्चितीचा विकल्प तात्काळ द्यावा. असा विकल्प न दिल्यास, त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्र.११ (१) (ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

६. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. सदर पदोन्नतीने पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित अधिकाऱ्यांना पदोन्नतीच्या पदावर हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास त्वरीत कळवावे.

७. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०८१३१७२८४३७७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANANDA SHANKAR SHENDAGE

Digitally signed by ANANDA SHANKAR SHENDAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=0db7067f83b51744741b4485650edc8705560188be635df819605b4913ead056, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DCED31BA3BA0E455430F67304905C6E3544DAE39602268D4CF2844818A1F80A4, cn=ANANDA SHANKAR SHENDAGE
Date: 2024.08.13 17:43:37 +05'30'

**(आनंदा शेंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, म.रा., पुणे.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), पुणे
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक /सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव)

८. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर
९. सर्व वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण
१०. सर्व उपवनसंरक्षक
११. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१२. सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.-१२), मंत्रालय, मुंबई-३२
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहायक.
१५. संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत.
१६. निवड नस्ती (फ-८ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२